# *पवारी/पोवारी बोली : झुंज अस्तित्वाची*

- *डॉ. ज्ञानेश्वर टेंभरे*

पवार/पोवार नावाच्या जातीचे लोक महाराष्ट्रामध्ये विदर्भ क्षेत्रात गोंदिया, भंडारा, नागपुर आणि वर्धा तसेच मध्यप्रदेशातील महाकौशल क्षेत्रातील बालाघाट, सिवनी, छिंदवाडा आणि बैतुल या जिल्ह्यांतील ग्रामीण भागात पीढ्यांनोपीढया निवास करीत आहेत. त्यांचा मुळ व्यवसाय शेती आहे. आधुनिक काळात शिक्षण आणि व्यवसायिक प्रशिक्षण घेऊन नवीन पीढिचे लोक मोठ्या प्रमाणात नोकरी, व्यवसाय व उद्योग क्षेत्राशी जुडून महाराष्ट्र, मध्यप्रदेश तसेच छत्तीसगड राज्यातील तसेच भारतातील अन्य शहरात वास्तव्य करीत आहेत. ह्या समाजाच्या लोकांना वेगवेगळ्या भागात पंवार किंवा भोयर-पवार या नावाने सुध्दा ओळखले जाते. त्यांची आपली मातृभाषा पवारी/पोवारी/भोयरी बोली आहे.

सुप्रसिद्ध भाषाविद जॉर्ज अब्राहम ग्रियर्सन (१८९८-१९२७) अनुसार पवारी/पोवारी ही बुंदेली भाषेच्या १४ प्रकारांमधील एक प्रकार (Variety) आहे. विमलेश कांतिलाल वर्मा (१९९५) यांनी पवारी/पोवारी ला "हिंदीची एक उपभाषा म्हणून वर्गीकरण केले आहे. गणेश देवी (२०१३) यांनी महाराष्ट्रातील भाषा सर्वेक्षण अंतर्गत पवारी/पोवारी बोलीचे संक्षिप्त वर्णन केलेले आहे. हेमंत कुकरेती (२०१८) यांनी सातपुडा विभागीय क्षेत्रामध्ये बालाघाट ते बैतुल पर्यंत पवारी भाषेच्या वाचिक/लिखित साहित्याचे सविस्तर वर्णन केलेले आहे. अंकित गंगोपाध्याय (२०२०) यांनी पवारी/पोवारी भाषेचे आंतरराष्ट्रीय भाषा कोड pwr, वर्तमान स्थिती - B-6 म्हणजेच असुरक्षित (threatened) असल्याची उल्लेख केलेला आहे.

पवारी भाषेवर विभिन्न भारतीय विद्यापीठातील संशोधकांनी संशोधन केले आहे. त्यामध्ये डाॅ सु. बा. कुळकर्णी (१९७४) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, मंजु अवस्थी (१९९९) रविशंकर शुक्ल विश्वविद्यालय रायपूर, शारदा कौशिक (२०१४) बरकतुल्लाह विश्वविद्यालय भोपाळ, भारती शरणागत (२०२२) रानी दुर्गावती विश्वविद्यालय जबलपूर तसेच तुफानसिंह पारधी (२०२३) महात्मा गांधी आंतरराष्ट्रीय हिंदी विश्वविद्यालय वर्धा यांचा समावेश आहे. एक जिज्ञासा म्हणून ज्ञानेश्वर टेंभरे (२०११, २०२०, २०२१, २०२३) यांनी सखोल अध्ययन करुन पवारी बोलीचे भाषा विज्ञान, लोकसाहित्य आणि शब्दकोश "पवारी ज्ञानदीप" पुस्तकात सादर केले व काही लेख साहित्यिक पत्रिकांमध्ये पण प्रकाशित केले आहेत. ह्या सर्व संशोधनांतून महत्वाचा निकष म्हणजे -

१. पवारी बोली मध्ये फक्त अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ हे ९ स्वर आहेत. औ चा अव किंवा अऊ, अं चा अम आणि अः चा अहा असा उच्चार होतो.

२. पवारी बोली मध्ये फक्त २८ व्यंजन आहेत. ण, ळ, श, ष, ज्ञ, क्ष, श्र, ऋ, ॠ, ऌ, ॡ,,ङ, ञ इत्यादी नाहीत. ण चा न, ळ चा ल किवा र, श आणि ष चा स, ज्ञ चा द्न्य, क्ष चा अक्स, श्र चा स्र असा उच्चार होतो.

३. पवारी बोली मध्ये विसर्ग-महाप्राण (:) चा उपयोग नाही - दुःख चा दुख, स्वतः चा सताहा होतो. तसेच अल्पप्राण चा पण उपयोग होत नसतो - भूक ला भुक, हाथ ला हात, दूध ला दुद, जीभ ला जिब म्हणतात.

४. पवारी बोली मध्ये मराठीतील व चा हिंदी समुहातील भाषांप्रमाने ब होतो, उदाहरणार्थ - वन - बन, वाघ- बाघ, विहिर - बिहिर, वाडा - बाबा इत्यादी.

५. पवारी बोली मध्ये फक्त ३३ सर्वनामे आहेत - मि, आमी, तु, तुमी, उ (तो), वा (ती), वय (ते) ही प्रथम व द्वितीय पुरुष वाचक सर्वनामे जरी मराठीच्या सर्वनामांशी समानता दर्शवित असली तरी तृतीय पुरुष वाचक सर्वनामे बुंदेलीच्या तृतीय सर्वनामांशी साम्य दर्शवितात. अनिश्चयवाचक सर्वनामे- कोन्ही, जसो, तसो, इत्, उत् बुंदेली बोली तर "कोन" मराठीशी साम्य दर्शवितात. कर्ता, कर्म, करण, संप्रदाय, अपादान, संबंध, अधिकार, कारक इत्यादी रुपांतरित सर्वनामे बुंदेली, बघेली सी जुळतात. पवारी मध्ये हिंदी भाषा-समुहा सारखे फक्त पुल्लिंग आणि स्त्रीलिंग असे दोनच लिंग आढळतात. म्हणुनच पवारी बोली चे पूर्वीभारतीय हिंदीची उपभाषा म्हणून केलेले वर्गीकरण योग्य वाटते.

६. पवारी बोली मध्ये प्रयुक्त विभक्ती प्रत्यय मध्ये सप्तमी चा "मा" गजरातीचा, षष्ठी चा "को" हिंदीचा आणि चतुर्थीचा "ला" मराठी सीन साम्य दर्शवितात.

७. "दुन", "परा", "आडपा", वगैरे परसर्ग राजस्थानी व गुजराती भाषांसी साम्य दर्शवितात.

८. पवारी क्रियापदे - से/आय (आहे), सेतू/सेती (आहेत) ही राजस्थानी क्रियापदे वाटतात.

९. पवारी बोली मध्ये भूतकाळ कर्म बघेली बोलीच्या कर्म समान आहेत, जसे - खायो, पियो, उठेव, बसेव, पडेव, लगेव वगैरे.

१०. पवारी बोली मध्ये संयुक्त शब्द विग्रहित करुन बोलतात, जसे - प्रकाश - परकास, प्रकार-परकार, श्रीराम - सिरिराम, कृष्ण - किरिसनं, पार्वती - पारबती, गौरी - गवरी इत्यादी.

वरील निकषांवरुन स्पष्ट होते की पवारी बोली मध्ये बुंदेली, बघेली, राजस्थानी, गुजराती, मराठी सोबत काही प्रमाणात साम्य आढळतो. तसेच पवारी बोली ने मराठी शब्दांना मोठ्या प्रमाणात आत्मसात केले आहे. पवारी बोली मालवा क्षेत्रातील मानकरी आणि स्थानीय हलबी-कोष्टी, लोधी, करारी, कुंभारी ह्या बुंदेलीच्या पोट-भाषांशी बहुतांश मिळती-जुळती आहे.

शेरिंग (१८७९) तसेच रसेल आणि हिरालाल (१९१६) यांनी पवार/पोवार लोक औरंगजेबच्या शेवटच्या कालखंडात मालवा प्रांतातून मध्यभारतीय प्रांतात (Central Provinces of India) स्थानांतर करुन सैनिक म्हणून गोंड राजे बख्तबुलंद शाह व नंतर रघुजी राजे भोसलेंच्या सैन्यात भरती झाले. कटकच्या लढाईत अलौकिक कामगिरी केली म्हणुन त्यांना ह्या प्रदेशात गावोगावी बसविले, शेती करण्याकरीता जमीनी दिल्या असे वर्णन केलेले आहे. त्यांनी आपल्यासोबत आपली पवारी/पोवारी बोली-भाषा आणली असल्याचा उल्लेखपण केलेला आहे. रसेल आणि हिरालाल यांनी आपल्या ग्रंथात - "कास्टस् एण्ड ट्राईब्स आफ सेन्ट्रल प्रोव्हिन्सेस एण्ड बेरार" मध्ये काही पवारी लग्नाची गाणी इंग्रजी अनुवादासह दिलेली आहेत.

सद्यास्थितीत पवारी बोलीभाषा ही अत्यंत दयनीय स्थितीत वाटचाल करीत आहे. इंग्रजी शासन काळापासून दर दहा वर्षांनी जनगणना अभियानांतर्गत भारतीय मातृभाषेत सर्वेक्षण करण्यात येत असते. या सर्वेक्षणानुसार असे निदर्शनास आले आहे की पवार/पोवार समाजातील मागील तीन-चार पीढीच्या लोकांनी मराठी, हिंदी तसेच इंग्रजी भाषेतून शिक्षण घेऊन आपल्या मातृभाषेचा घरी किंवा बाहेर परित्याग करत ह्या शालेय भाषांचा वापर करु लागले. याचा दुष्परिणाम पवारी भाषेवर झालेला आहे. इ.स. २००१ च्या जनगणना संलग्न मातृभाषा सर्वेक्षण यादी अनुसार फक्त ४,२५,८४५ (चार लक्ष पंचवीस हजार आठशे पंचेचाळीस) पवार लोक आपली पवारी भाषा बोलतात. एक दशकानंतर म्हणजेच इ.स. २०११च्या जनगणना संलग्न मातृभाषा सर्वेक्षण यादी अनुसार पवारी भाषा बोलणाऱ्यांची संख्येत घट होऊन ३,२५,७७२ (तीन लक्ष पंचवीस हजार सातशे बहात्तर) वर आलेली आहे. याच जनगणना अहवालानुसार जनसंख्या वृद्धी दर १७.२०% वाढले आहे पण पवारी बोरणार्या लोकांच्या संख्येत घट झालेली आहे. दुसरं निकष म्हणजे वर्तमान काळात अंदाजे ४५-५० लाख लोकसंख्या असलेल्या पवार समाजातील फक्त १०% च्या आसपास हे लोक आपली भाषा बोलत असल्याचे दिसून येते.

पुरातन काळापासून पवार/पोवार लोकांची पवारी/पोवारी बोली ही आपसात देवाण-घेवाण व बोलाचालीची भाषा राहिली आहे. सण, उत्सव, लग्न समारंभ, सोळा-संस्कार, ग्रामीण भागात घरगुती पिठाची चक्की (जाता) धान-रोवणी (पर्हा), बाग-बगीचे इत्यादींवर अनेक लोक-गीत, लग्नाची गाणी, लोक-कथा,

मंगळागौरची गाणि, ग्रामीण मनोरंजनाची गाणी, अंगाई-गीत, म्हणी तसेच उखाणे इत्यादी आहेत. परंतु या संदर्भातील लिखित साहित्य उपलब्ध नव्हते.

पवारी भाषेचे जतन करावयाचे असल्यास तिचा दैनंदिनी उपयोग, प्रचार-प्रसार तसेच विविध गद्य, पद्य साहित्य निर्माण इत्यादी प्राथमिक स्वरूपाचे कार्य करणे ही काळाची गरज आहे. या उद्येशपूर्तीमध्ये सर्वप्रथम डाॅ. सु.बा. कुलकर्णी यांनी लक्ष देत "पोवारी बोलीचे भाषा-वैज्ञानिक अध्ययन" या शीर्षकांतर्गत शोध प्रबंध सादर करून त्यावर नागपूर विद्यापीठामधून आचार्य (पी.एच.डी) पदवी प्राप्त केली व लगेच (इ.स. १९७४) नागपूर विद्यापीठाच्या प्रकाशन विभागाच्या माध्यमातून "पोवारी बोली" नावाचे पुस्तक प्रकाशित केले. यानंतर पवार समाजातील काही सुज्ञ जनांनी - यादोराव चौधरी - "गीत गंगा" (१९९८), "बिह्या का गाना" (२००२); मनराज पटले - "भाऊ आता जागो" (२००१), "त् आता करोना आपलो विकास" (२००५), "गावो दम दमा दम, नाचो छम छमा छम" (२००८); जयपालसिंह पटले - "पवार गाथा" (२००६), ग्रामगीता" (२००९), "पवारी गीत गंगा" (२०१०, "गीत रामायण" (२०१२), "श्रीमद् भागवत गीता सार" (२०१४), "राजा भोज गीतांजलि" (२०१५); गोपीनाथ कालभोर - "पवारी लोक-साहित्य काव्य" (२००६), "पवारी का आधुनिक काव्य" (२०११), "पवारी गीत" (२०१२); वल्लभ डोंगरे - "पवारी लोक-साहित्य" (२०११), "रुनुक झुनुक - पवारी शब्दकोश" (२०११) आणि ज्ञानेश्वर टेंभरेनी "पवारी ज्ञानदीप - पवारी बोली भाषाविज्ञान, लोक साहित्य, शब्दकोश" (२०११), "गूंज उठे पवारी काव्यसंग्रह" (२०१७) इत्यादी लहान-मोठी पुस्तके प्रकाशित केली आहेत. परंतु यास पवारी बोली साहित्य सृजन चे व्यक्तिगत प्रयत्नच म्हणावं लागेल.

पवारी बोली सृजन, संवर्धन करिता एक सशक्त व्यासपीठ बनविण्याच्या उद्देश्याने ज्ञानेश्वर टेंभरे यांच्या नेतृत्वाखाली "पवारी साहित्य कला संस्कृति मंडळ" ची दिनांक ०४ नोव्हेंबर २०१८ ला स्थापना करण्यात आली. लगेच पवारी बोलीचे कवि आणि लेखकांना शोधून "पवारी साहित्य मंडळ नामक" वाट्स अप समुह तयार करुन साप्ताहिक काव्य आणि निबंध/लेख-स्पर्धांची सुरुवात केली. आतापर्यंत सुमारे २२५ -३० साप्ताहिक काव्य-स्पर्धा आणि ९०-९५ लेख-स्पर्धा सफलतापूर्वक आयोजित करण्यात आलेल्या आहेत.

पवारी साहित्य कला संस्कृती मंडळ द्वारा दरवर्षी "अखिल भारतीय पवारी साहित्य सम्मेलन" आयोजित करण्यात येतो आणि पुस्तक दिंडी, परि-चर्चा, कवि सम्मेलन, कला प्रदर्शनी आणि "पवारी साहित्य सरिता" नामक वार्षिक स्मरणीकेचे प्रकाशन इत्यादी उपक्रम राबविले जातात. आतापर्यंत पवारी साहित्य सरिताचे चार अंक प्रकाशित झालेले आहेत. प्रत्येक अंकात ३५-४० लेख आणि ८०-१०० काव्य

रचना प्रकाशित होत असतात. प्रत्येक अधिवेशनामध्ये काव्य-रत्न, लेख-रत्न, कला-रत्न, गायक-रत्न, जीवन गौरव इत्यादी पुरस्कार दिले जातात.

दर सम्मेलनात नव-प्रकाशित पवारी बोलीच्या पुस्तकांचे विमोचन करण्यात येत असते. आजपर्यंत पवारी बोली ची खालील २० पुस्तके प्रकाशित झालेली आहेत -

*वर्ष २०१९ -* १) दुर्वांकुर (कथा संग्रह) - ज्ञानेश्वर टेंभरे, २) पोवारी मायबोली अमर रह्ये (लेख+गीत) - सी. एच. पटले;

*वर्ष २०२० -* ३) बुलंद करो पवारी (काव्य संग्रह) - ज्ञानेश्वर टेंभरे, ४) गांव शिवार (कथा संग्रह) हिरालाल बिसेन, ५) मन को घाव (काव्य संग्रह) - देवेंद्र चौधरी, ६) पोवारी साहित्य मंजुषा (लेख+कविता) - लखनसिंह कटरे, ७) भोयरी शब्दकोष - सुरेश देशमुख;

*वर्ष २०२१ -* ८) मोरो काव्य छंद (काव्य संग्रह) - ज्ञानेश्वर टेंभरे, ९) पेंडी (काव्य संग्रह) - देवेंद्र चौधरी, १०) भोयरी संस्कृति - सुरेश देशमुख, ११) काव्य मंजिरी (काव्य संग्रह) - सी. एच. पटले, १२) काव्य कुंज (काव्य संग्रह) - छगनलाल रहांगडाले, १३) काव्य धारा (काव्य संग्रह) - चिरंजीव बिसेन, १४) गुरु गंगा (काव्य संग्रह) - सौ. फुलनबाई चौधरी;

*वर्ष २०२२* - १५) डबल सेंचुरी काव्य संग्रह - संपादक, पवारी साहित्य कला संस्कृति मंडल, १६) पवारी सरित् सागर (संस्मरण+कहानी+ लेख) - ज्ञानेश्वर टेंभरे, १७) थेगरा (दीर्घ काव्य) - देवेंद्र चौधरी, १८) माती की पुण्याई (काव्य संग्रह) - तुकाराम किनकर, १९) नक्षत्र (काव्य संग्रह) - यादोराव चौधरी, २०) पोवार समाज तथा पोवारी बोली ( लेख संग्रह) - लखनसिंह कटरे.

पवारी साहित्य कला संस्कृती मंडळाच्या मागिल पांच वर्षात नामवंत मराठी, हिंदी साहित्यिक पत्रिकांमध्ये पवारी बोली वर पाच-सहा लेखकांनी १०-१२ लेख प्रकाशित केली आहेत।

***संदर्भ -***

Rev. Shering, M. A. Hindu Tribes and Castes, Vol. 2, Frst Pub. 1879, Indian Reprint 2017, Kalpaz Publications, Delhi.
Russell, R.V. and Hiralal, R.B. Tribes and castes of the Central Provinces of India Vol. IV, Part II. MacMillon, London, 1916.
Grierson, G. A. : Linguistic survey of India, Vol 6, 7, 9, Government Printing Press, Calcutta, 1904 - 1927.
कुलकर्णी, सु. बा. : पोवारी बोली, नागपूर विद्यापीठ प्रकाशन, 1974.
वर्मा विमलेश कांति : हिंदी और उसकी उपभाषाएं, प्रकाशन विभाग, भारत सरकार, नई दिल्ली (१९९५).
टेंभरे ज्ञानेश्वर : पवारी ज्ञानदीप, हिमालया पब्लिशिंग हाउस मुंबई (२०११).
देवी गणेश : भारतीय भाषांचे लोक सर्वेक्षण - महाराष्ट्र, भाषा संशोधन एवं प्रकाशन संस्था बडोदरा (२०१३).
कुकरेती, हेमंत : भारत की लोक संस्कृति, प्रभात पेपरबॅक्स नई दिल्ली (२००१८).
Gangopadhyay, Avik : Glimpses of Indian Languages, Evidencepub publishing, Bilaspur (2020).
टेंभरे, ज्ञानेश्वर : पोवारी बोलीचे स्वरुप, युगवाणी, विदर्भ साहित्य संघाचे वांगमयीन नियतकालिका, (जानेवारी-मार्च २०२०).
टेंभरे, ज्ञानेश्वर : पोवारी ही बुंदेलीची उपभाषा, प्रतिष्ठान, मराठवाडा साहित्य परिषदेचे वांगमयीन नियतकालिका (मे - ऑगस्ट २०२१).
टेंभरे, ज्ञानेश्वर : भाषाविदों की विहंगम दृष्टि में पवारी/पोवारी बोली, हिंदुस्तानी भाषा भारती त्रैमासिक पत्रिका, हिंदुस्तानी भाषा अकादमी, दिल्ली ( जनवरी - मार्च, २०२३).

*** डॉ ज्ञानेश्वर टेंभरे***
अध्यक्ष, पवारी साहित्य कला संस्कृती मंडळ (पंजीकृत)
४४-विजयनगर, दक्षिण अम्बाझरी मार्ग,
नागपुर - ४४००२२.
मोबाइल- ९०९६०८८४३६
ईमेल - dbtembhare@gmail.com